**मा. लोकआयुक्त /उपलोकआयुक्त यांचेकडील सुनावणीबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
परिपत्रक क्रमांक संकिर्ण-२०१०/प्र.क्र.१५६/आस्था-११
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- ३१ जुलै, २०१०.

**परिपत्रक :-** सेवानिवृत्त कर्मचारी /त्यांचे वारसदार हे त्यांना निवृत्तीवेतनाचे लाभ वेळेवर न मिळाल्याने मा.लोकआयुक्त यांचेकडे तक्रारी करतात. संबंधित तक्रारींच्या अनुषंगाने मा.लोकआयुक्त /उप लोकआयुक्त हे महाराष्ट्र लोकआयुक्त आणि उपलोकआयुक्त कायदा, १९७१ मधील त्यांना असलेल्या अधिकारात संबंधित प्रकरणांची सुनावणी ठेवतात. त्या सुनावणीसाठी मंत्रालयीन विभागाचे सचिव, संबंधित विभाग प्रमुख यांना हजर राहण्याबाबत कळविले जाते. याबाबत मा. उपलोकआयुक्त यांनी निदर्शनास आणले आहे की, अशी प्रकरणे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडून गांभीर्याने घेतली जात नाहीत, त्याबाबतचे अहवाल वेळेत पाठविले जात नाहीत, शिवाय सुनावणीस स्वतः हजर न राहता कनिष्ठ कर्मचाऱ्यास साक्षीसाठी पाठविले जाते, ही अत्यंत गंभीर बाब आहे.

२. मा.लोकआयुक्त यांचेकडील सेवानिवृत्त जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांची प्रकरणे प्राधान्याने निकालात काढून त्याबाबतचा परिपूर्ण अहवाल मा. लोकआयुक्तांना वेळेत सादर होणे आवश्यक आहे. बऱ्याच प्रकरणांमध्ये मा. लोकआयुक्त महोदयांकडून विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषदा यांचेकडून परस्पर अहवाल मागविले जातात. त्यांचेकडून वारंवार स्मरणपत्रे पाठवूनही अहवाल मा. लोकआयुक्त महोदयांकडे पाठविले जात नाहीत. त्यामुळे असे संदर्भ शासनास पाठपुराव्यासाठी पाठविले जातात. महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा नियम १९६८ मधील तरतुदींनुसार वर्ग ३ व वर्ग ४ च्या जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांचे सेवाविषयक शासनास असलेले अधिकार विभागीय आयुक्त यांना प्रदान केले आहेत. यास्तव वर्ग ३ व वर्ग ४ च्या सेवानिवृत्त जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या मा.लोकआयुक्तांकडील प्रकरणांचा आढावा विभागीय आयुक्त स्तरावर नियतकालिक स्वरुपात घेण्यात यावा. तसेच मा.लोकआयुक्त/उपलोकआयुक्त यांच्याकडील सुनावणीच्या वेळी विभागीय आयुक्त स्तरावरील एक प्रतिनिधी व संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी उपस्थित राहावे. भविष्यात या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता घ्यावी.

३. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१००७३१२०५८४५००१ असा आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

३१/७/२०
(राजेंद्र वाघ)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
३. उप आयुक्त (आस्थापना) सर्व विभागीय आयुक्त कार्यालये.
४. सर्व सह सचिव/उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व प्रशासकीय कार्यासनांचे अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मुंबई ३२.
६. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१५), मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती (आस्था११),